**माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील वरिष्ठ उपसंपादक हे पद उपसंचालक (माहिती) पदामध्ये श्रेणी उन्नत करुन सदर पदी श्री. राहुल तिडके यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत.**



**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क. ०१/का.३४ अ,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १ मार्च, २०२३

**संदर्भ** : १) सुचना आणि प्रसारण मंत्रालय, भारत सरकार यांचे दिनांक १५.११.२०२२ रोजीचे आदेश क्र.१०३/२०२२-IIS
२) Press Information Bureau, Government of India, Mumbai यांचे दिनांक ३०.११.२०२२ रोजीचे आदेश
३) माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे पत्र क्र. प्रविस्था-१२(२०२२)/सं(मा) /प्रतिनियुक्ती/का-१/२९१७/२०२२, दि. ३०.११.२०२२
४) श्री. राहुल आत्माराम तिडके(भारतीय सूचना सेवा ) यांचा अर्ज दिनांक ३०.११.२०२२
५) कार्यालयीन आदेश , समक्रमांक दि. ०९.१२.२०२२.

**प्रस्तावना:**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील केंद्रशासनाच्या दिनांक १५.११.२०२२ च्या आदेशानुसार श्री. राहुल आत्माराम तिडके (IIS:2012), उपसंचालक (M&C), PIB, मुंबई यांची महाराष्ट्र शासनाच्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयात प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली आहे. तसेच, संदर्भ क्र २ च्या आदेशानुसार श्री. तिडके यांना संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई या पदावर रुजू होण्यासाठी दि.३०.११.२०२२ (म.नं.)कार्यमुक्त करण्यात आले असून ते उक्त संदर्भ क्र.४ नुसार दिनांक ३०.११.२०२२ (म.नं.) पासून रुजू झाले आहेत.

श्री.राहुल आत्माराम तिडके (IIS:2012), उपसंचालक (M&C), PIB, मुंबई हे केंद्रशासनाच्या सेवेत उप संचालक दर्जाचे अधिकारी असल्याने त्यांना उप संचालक या पदावर पदस्थापना देणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

उपरोक्त संदर्भाधिन क्र.५ येथील कार्यालयीन आदेश दि. ९.१२.२०२२ याद्वारे रद्दबातल करण्यात येत आहे.

२. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या आस्थापनेवरील मंजूर पदांच्या आकृतीबंधामधील “वरिष्ठ उपसंपादक “ ( एस-१८: रु. ४९,१००- १,५५,८००) हे पद “उपसंचालक” या पदामध्ये रुपांतरीत करुन एस-२३ (६७,७००-२,०८,७५०) या वेतन संरचनेत

श्रेणी उन्नत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. तसेच श्रेणी उन्नत केलेल्या उपसंचालक या पदाचे नामाभिदान "उपसंचालक (माहिती)" असे करण्यात येत आहे.

३. उपरोक्तपणे श्रेणी उन्नत केलेल्या "उपसंचालक (माहिती)" या पदावर श्री. राहुल आत्माराम तिडके (IIS:२०१२) उपसंचालक (M&C), PIB, मुंबई यांची एस-२३ (६७,७००-२,०८,७५०) या वेतन संरचनेत दि. ०१.१२.२०२२ (म.पू.) पासून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

४. सदरचे श्रेणी उन्नत केलेले "उपसंचालक (माहिती)" हे पद श्री. राहुल आत्माराम तिडके, उपसंचालक (M&C), PIB, मुंबई हे त्या पदावर कार्यरत असेपर्यंत अथवा वरिष्ठ उपसंपादक पदावर सरळसेवेने उमेदवार प्राप्त होईल यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अस्तित्वात राहील व त्यानंतर सदर पद आपोआप मूळ पदात म्हणजेच "वरिष्ठ उपसंपादक " या पदामध्ये रुपांतरित होईल.

५. सदरचे श्रेणी उन्नत केलेले पद व त्यावरील संबंधित अधिकारी यांची नियुक्ती ही माहिती व जनसंपर्क महासंचालनालयास त्यांच्या सेवेची आवश्यकता असेल किंवा त्यांच्या मूळ विभागास /कार्यालयास त्यांच्या सेवेची आवश्यकता भासेल यापैकी जो अगोदरचा कालावधी असेल तोपर्यंत असेल .

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग यांच्या अनौपचारिक सं.क्र. ८/२०२३/सेवा-९ दिनांक १२.०१.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. श्री.राहुल तिडके यांच्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्तींबाबत सविस्तर आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०११८११५३६१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPALI PATHAK

Digitally signed by DEEPALI PATHAK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=245ec1be5f40ed10b626817ad30a304c166dfdaf8cfc319c79bbe3e5015ee80d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=33F1FFF2431345C1855F0CF55F805FE479712905981CC867AA66332A9FB5C6D5, cn=DEEPALI PATHAK
Date: 2023.03.01 18:32:15 +05'30'

**(दीपाली पाठक)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सचिव (मा.व ज.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय , मुंबई
२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, तळ मजला, मंत्रालय, मुंबई-३२.
३) महासंचालक,PIB, नवी दिल्ली
४) संचालक(Admn.I), PIB, नवी दिल्ली/ मुंबई
५) संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, तळ मजला, मंत्रालय, मुंबई -३२.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८) श्री. राहुल आत्माराम तिडके (IIS:2012), उपसंचालक (माहिती) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग/ सेवा-९, मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती.